**कृषी यांत्रिकीकरण उप अभियान सन २०१८-१९ मध्ये राबविण्यासाठी रु.२५००० लक्ष निधीच्या कार्यक्रमास सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कृयायों-१०१७/प्र.क्र.२०२/१४-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई- ४०० ०३२
तारीख: ०४ जानेवारी, २०१९.

**संदर्भ :-**

१. कृषी व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.०४१८/प्र.क्र.१५५/१४-अे, दि.२७ एप्रिल, २०१८.
२. केंद्रीय कृषी व शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्र.१३-८७/२०१६-M&T(I&P), दि. २५.०५.२०१८.
३. केंद्रीय कृषी व शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्र.३-१/२०१५-M&T(I&P),दि.१२.०६.२०१८
४. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.कृयांउ-१०१७/ प्र.क्र.६४/१७/१४-अे, दि. २७.०६.२०१८
५. केंद्रीय कृषी व शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्र.३-१/२०१५-M&T(I&P), दि ०५.०६.२०१८
६. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. कृयायों-१०१७/ प्र.क्र.२०२/१४-अे, दि.१८ जुलै, २०१८.
७. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. कृयायों-१०१७/ प्र.क्र.२०२/१४-अे, दि.१९.०७.२०१८.
८. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. कृयायों-१०१७/ प्र.क्र.२०२/१४-अे, दि.१४.०८.२०१८.
९. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. कृयायों-१०१७/ प्र.क्र.२०२/१४-अे, दि.२८.०८.२०१८.
१०. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. कृयायों-०८१८/ प्र.क्र.२४३/१४-अे, दि.१६.११.२०१८.
११. केंद्रीय कृषी व शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्र.३-१ (महाराष्ट्र)/२०१५-M&T(I&P),दि. २८.११.२०१८.
१२. केंद्रीय कृषी व शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्र.३-१/२०१५-M&T(I&P), दि. ४.१२.२०१८

**प्रस्तावना:-**

राज्यात केंद्र पुरस्कृत कृषी यांत्रिकीकरण उप-अभियान राबविण्यात येत आहे, या अभियानांतर्गत ८ घटक असून, घटक क्र. १ व २ हे नवीन तंत्रज्ञानाने विकसित केलेल्या संयंत्राची प्रात्यक्षिके, प्रशिक्षण व चाचणीबाबत असून त्या साठी केंद्र शासन १००% अर्थसहाय्य करते आणि उर्वरित ६ घटकांसाठी केंद्र व राज्य शासनाचे ६०:४० प्रमाणात अर्थसहाय्य दिले जाते.

सन २०१८-१९ मध्ये केंद्र शासनाने कृषी यांत्रिकीकरण उप- अभियानांतर्गत राज्य शासनास संदर्भाधीन दि.१२ जून व दि. ५ जुलै, २०१८च्या पत्रान्वये पुढील दोन टप्प्यात कार्यक्रम मंजूर केलेला आहे:

| अ.क्र. | कृषी यांत्रिकीकरण उप- अभियानांतर्गत मंजूर कार्यक्रम | आर्थिक लक्षांक (रु. लाख) | | |
|---|---|---|---|---|
| | | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण |
| १ | ४ आकांक्षित जिल्हयांमध्ये कृषी कल्याण अभियान राबविणे (उस्मानाबाद ,वाशिम ,गडचिरोली व नंदुरबार) | ८०० | ५३३.३३ | १३३३.३३ |
| २ | कृषी यांत्रिकीकरण उप- अभियानांतर्गत नियमित कार्यक्रम | ३७५० | २५०० | ६२५० |
| **एकूण** | | **४५५०** | **३०३३.३३** | **७५८३.३३** |

उपरोक्त मंजूर कार्यक्रमाच्या अनुषंगाने संदर्भाधीन अ.क्र. ४ व ६ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे आणि संदर्भाधीन अनु.क्र. ४, ६ ते १० येथील शासन निर्णयान्वये सर्वसाधारण, अनुसूचित जाती व जमाती प्रवर्गासाठी चा केंद्र व राज्य हिश्श्याचा मिळून एकूण रु.७३६६.७६७७ लक्ष निधी आयुक्त (कृषी) वितरीत करण्यात आला आहे.

घटक क्र.१ च्या अंमलबजावणीसाठी (प्रशिक्षण, चाचणी आणि प्रात्यक्षिकांच्या माध्यामातून कृषी यांत्रिकीकरणाचा प्रचार आणि बळकटीकरण) केंद्र शासनाने संदर्भाधीन अनु.क्र.११ येथील पत्रान्वये, ड्रोन तंत्रज्ञानाच्या प्रात्यक्षिकांसाठी रु.५० लक्ष निधी प्रकल्प संचालक, आत्मा, यवतमाळ यांना वितरीत केलेला आहे. त्याचप्रमाणे, संदर्भाधीन अनु.क्र.१२ येथील पत्रान्वये, केंद्र शासनाने महाराष्ट्रास चालु वर्षी कृषी यांत्रिकीकरण उप अभियानांतर्गत एकूण रु.२५,००० लक्ष (केंद्र - रु.१५,००० लक्ष व राज्य - रु.१०,००० लक्ष) निधीच्या कार्यक्रमास मान्यता दिली असून त्यानुसार सदर कार्यक्रमास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्याबाबात शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

१. संदर्भाधीन दि.१८ जुलै, २०१८ च्या शासन निर्णयान्वये सन २०१८-१९ मध्ये कृषि यांत्रिकीकरण उप अभियानाची अंमलबजावणी करण्यासाठी एकूण रु. ७५८३.३३ लक्ष निधीस प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती तथापि, या शासन निर्णयान्वये सदर अभियानाच्या अंमलबजावणीसाठी आता रू.२५,००० लक्ष निधीच्या (केंद्र हिस्सा रू.१५,००० लक्ष व राज्य हिस्सा रू.१०,००० लक्ष) कार्यक्रमास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.
२. उपरोक्त प्रमाणे कृषि यांत्रिकीकरण अभियानास देण्यात येत असलेल्या प्रशासकीय मान्यतेचा तपशील खालीलप्रमाणे आहे :

| अ.क्र. | कृषी यांत्रिकीकरण उप- अभियानांतर्गत मंजूर कार्यक्रम | आर्थिक लक्षांक (रु. लाख) | | |
|---|---|---|---|---|
| | | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण |
| १ | ४ आकांक्षित जिल्हयांमध्ये कृषी कल्याण अभियान राबविणे (उस्मानाबाद ,वाशिम ,गडचिरोली व नंदुरबार) | ८०० | ५३३.३३ | १३३३.३३ |
| २ | कृषी यांत्रिकीकरण उप- अभियानांतर्गत नियमित कार्यक्रम | ३७५० | २५०० | ६२५० |
| ३ | कृषी यांत्रिकीकरण उप- अभियानांतर्गत अतिरिक्त कार्यक्रम | १०४५० | ६९६६.६७ | १७४१६.६७ |
| **एकूण** | | **१५०००** | **१००००** | **२५०००** |

३. केंद्र शासनाने प्रकल्प संचालक (आत्मा), यवतमाळ यांना ड्रोन तंत्राज्ञानाच्या प्रात्यक्षिकासाठी परस्पर वितरीत केलेला रु.५० लाख निधी त्यांनी कृषी यांत्रिकीकरण उप अभियानाच्या मार्गदर्शक सूचना तसेच केंद्र शासनाच्या दि.२८ नोव्हेंबर, २०१८ च्या मार्गदर्शक सूचनानुसार खर्च करुन सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र परस्पर केंद्र शासनास पाठवून त्याची प्रत संचालक (नि. व गु.नि) यांना पाठविण्यात यावी.

४. सदर कार्यक्रम राबविताना संदर्भाधीन अ १.क्र.येथील कृषी यांत्रिकीकरण उप अभियानाच्या मार्गदर्शक सूचना, संदर्भाधीन अनु.क्र.२ येथील दि.२७ एप्रिल, २०१८ च्या उन्नत शेती समृध्द शेतकरी अभियानाच्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना व संदर्भाधीन केंद्र शासनाच्या पत्रातील सूचना, अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

५. सदर निधी खर्च करताना तो विहीत कार्यपद्धती अनुसरुन सर्व वित्तीय कायदे / प्रकियाचे / वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत / C.V.C. तत्वानुसार /प्रचलित शासन निर्णय / नियम / परिपत्रक / तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम / अधिकाराचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कार्यालयाची राहील.

६. कृषी यांत्रिकीकरण उप अभियानाच्या उद्दिष्ट पूर्तीसाठी, संचालक (निविष्ठा व गुण नियंत्रण), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन, उदिष्टनिहाय अमलबजावणी विषयक सविस्तर सूचना सर्व क्षेत्रीय अधिकाऱ्यांना निर्गमित कराव्यात. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे या योजनेचा आर्थिक व भौतिक प्रगतीचा मासिक अहवाल प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत केंद्र शासनास सादर करावा. सदर अहवाल सादर करताना त्यामध्ये महिला शेतकरी, अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती शेतकरी यांच्यासाठी निर्धारित केलेले भौतिक / आर्थिक लक्षांक व साध्य याबाबतची माहिती वेगळयाने सादर होईल, याबाबत दक्षता घेण्यात यावी.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१०४१७४७५९८९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2019.01.04 17:52:48 +05'30'

**( श्रीकांत आंडगे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा.मंत्री (कृषि), मंत्रालय, मुंबई-३२
२. मा.राज्यमंत्री (कृषि),मंत्रालय, मुंबई-३२
३. सर्व सन्माननीय विधी मंडळ सदस्य, द्वारा विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. सचिव (कृषि), मंत्रालय,मुंबई-३२
५. आयुक्त (कृषि), कृषिआयुक्तालय,महाराष्ट्रराज्य, पुणे
६. संचालक (निविष्ठा व गुण नियंत्रण), कृषिआयुक्तालय, पुणे

७. सर्व संचालक/सह संचालक, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
८. विभागीय कृषि सह संचालक (सर्व)
९. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
१०. महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर (लेखा परिक्षा) /(लेखा व अनुज्ञेयता)
११. माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. नियोजन विभाग (का-१४३१) मंत्रालय, मुंबई-३२
१३. वित्त विभाग (व्यय-१ वअर्थसंकल्प - १३) मंत्रालय, मुंबई-३२
१४. मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगीसचिव
१५. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगीसचिव
१६. निवड नस्ती (कार्यासन -४अे).